**कार्यकारी अभियंता (स्थापत्य)**
**यांच्या बदल्या व नियुक्त्या**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन आदेश क्र.एलटीएस-१२११/(३०४/२०११)/आ.(वर्ग-१)
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : १०.०८.२०११

संदर्भ :- १)शासन आदेश क्र.एलटीएस-१११९/(१६८/२०११)/आ.(वर्ग-१)----(९), दि.३१.०५.२०११
२)शासन आदेश क्र.एलटीएस-१११९/(२५५/२०११)/आ.(वर्ग-१), दि.०८.०७.२०११

**आदेश**

संदर्भिय दि.३१.०५.२०११ च्या आदेशान्वये सार्वत्रिक बदल्या २०११ मध्ये श्री.र.बा.केंद्रे, कार्यकारी अभियंता, जायकवाडी पाटबंधारे विभाग, पैठण नाथसागर (उत्तर) यांची बदली कार्यकारी अभियंता, माजलगांव कालवा विभाग क्र.१०, गंगाखेड, परभणी या पदावर करण्यात आलेली होती. परंतु श्री.वि.बा.नाथ, कार्यकारी अभियंता यांचे दि.३१.०५.२०११ चे बदली आदेश सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय कारणास्त्व संदर्भिय क्र.२ अन्वये रद्द करण्यात आलेले आहेत. त्यामुळे श्री.केंद्रे यांना अन्यत्र पदस्थापना देणे क्रमप्राप्त झालेले आहे.

सदर प्रकरणी मा.प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद यांनी मूळ अर्ज क्र. ४५६/२०११ मध्ये दि.१२.७.२०११ रोजी पुढीलप्रमाणे अंतरीम आदेश दिलेले आहेत :-

" By the disputed order the applicant is not reposted on the previous post nor he is posted on any other post. With the above situation, it is necessary to protect the interest of the applicant till issuance of posting order for the applicant at the Government level as the contention of the applicant is that he has not handed over the charge of the post at Parbhani, as yet to respondent No. 5. Accordingly, respondent Nos. 1-to 3 are directed not to direct the applicant to handover the charge of his present posting at Parbhani to respondent No. 5 by implementing the communication / order dated 12 th July, 2011 issued by respondent No. 2. "

न्यायाधिकरणाने वरीलप्रमाणे दिलेल्या अंतरीम आदेशाविरुध्द दाखल करण्यात आलेल्या रिट याचिका क्र.५२६१/२०११ मध्ये मा.मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी दि.२२.७.२०११ अन्वये सदर रिट याचिका निकाली काढताना त्यांच्या आदेशामध्ये खालीलप्रमाणे नमूद केले आहेः-

" From perusal of the observations quoted above, it is clear that the petitioner is allowed to continue to hold the charge, till disposal of the original application . "

महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल झालेल्या मूळ अर्ज क्र. ४५६/२०११ मध्ये न्यायाधिकरणाने व मा. मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी रिट याचिका क्र.५२६१/२०११ मध्ये न्यायालयाने दिलेले निदेश विचारात घेऊन श्री.र.बा.केंद्रे यांच्या पदस्थापनेबाबत पुढीलप्रमाणे आदेश पारीत करण्यात येत आहेत :-

प्रशासकीय कारणास्तव बदलीच्या अधिनियमातील कलम ४ (४) व ४ (५) नुसार सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने श्री.केंद्रे यांना कार्यकारी अभियंता, जायकवाडी पाटबंधारे विभाग, पैठण नाथसागर (उत्तर) या पदावर दि.३१.०३.२०१२ पर्यन्त पदस्थापना देण्यात येत आहे.

सदर आदेशाची अंमलबजावणी ही मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणासमोरील प्रलंबित मूळ अर्ज क्र. ४५६/२०११ मध्ये पारित होणाऱ्या न्यायाधिकरणाचे पुढील आदेश अथवा अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

१०.४.११

(डॉ.माधव वीर)
**शासनाचे अवर सचिव**

प्रति,

सचिव (जलसंपदा) / सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ,औरंगाबाद
जलसंपदा विभागातील सर्व मुख्य अभियंते व सह सचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, औरंगाबाद
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाक्षेविप्रा, औरंगाबाद
अधीक्षक अभियंता, जायकवाडी प्रकल्प मंडळ, औरंगाबाद
खाजगी सचिव, मा.मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा.मंत्री (कृष्णा खोरे पाटबंधारे मंडळ), मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव , मा.राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
संबंधित अधिकारी
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
सह सचिव (सेवा) / अवर सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
आ.(वर्ग-१), कार्यासन संग्रहार्थ